**राज्य योजना सन २०१४-१५**

वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणा संबंधीत आवश्यक ती बांधकामे करणे.

**महाराष्ट्र शासन**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-१०.१४/प्र.क्र.२६३ /फ-१**

**महसूल व वन विभाग,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीखः-१३.०२.२०१५

**वाचा**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.५०/(१४-१५)/८३२, दिनांक १२.०८.२०१४.

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.

३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०२.०१.२०१५.

४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०१.०९.२०१४ व दिनांक २८.०१.२०१५

५) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०९.०२.२०१५.

**प्रस्तावना**

वार्षिक योजना सन २०१४-१५ राज्य योजनेअंतर्गत वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे याकरीता रुपये ३५०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यानुसार राज्यातील १३ राष्ट्रीय उद्याने/अभयारण्यांमध्ये वन्यपशु संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणेकामी एकूण रु. ३५०.०० लक्षचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. वित्त विभागाचे दिनांक ०१.०७.२०१४ व दिनांक ०२.०१.२०१५ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६०% मर्यादेत निधी वितरीत करण्याचे आदेश आहेत. त्या अनुषंगाने सन २०१४-१५ मध्ये विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या अधीन राहून ०२-मजूरी या उद्दिष्टाखाली मंजूर रु. १२६.०० लक्ष व २१-पुरवठा व सामुग्री या उद्दिष्टाखालील रु. ८४.०० असे एकूण २१०.०० लक्ष रुपये (रु. दोनशे दहा लक्ष ) निधी खर्च करण्यास संदर्भीय शासन निर्णय क्रमांक ४ अन्वये शासनाची मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

आता वित्तविभाग दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार ज्या प्रकरणात यापूर्वी सन २०१४-१५ मध्ये योजनांतर्गत अर्थसंकल्पित निधीपैकी ६० % निधी खर्च करण्याची परवानगी दिली असेल अशा प्रकरणात ७५% निधी वितरणासाठी नियोजन/वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता राहणार नाही. सबब वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे या (२४०६ २२२१) योजनेसाठी वित्त विभागाच्या दिनांक ०९.०२.२०१५ च्या परिपत्रकानुसार उर्वरित रु.५२.५० लक्ष (रु. २६२.५० लक्ष - रु. २१०.०० लक्ष )निधी खर्च करण्यास खालील अटींवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१४-१५ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव राज्य योजनांतर्गत योजना (००) (११) वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

४. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

६. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ०९.०२.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१३३७३९७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.13 13:57:46 +05'30'

**(अरविंद आपटे)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

सोबत:- वरीलप्रमाणे.

**प्रत,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई/ पूर्व, नागपूर/ नाशिक
५) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
६) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
७) सह संचालक, वन्यजीव, भारत सरकार, पर्यावरण व वन मंत्रालय, नवी दिल्ली-११० ०११.
८) महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
९) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

---

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-१०.१४/प्र.क्र.२६३ /फ-१, तारीख :- १३.०२.२०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष २४०६-२२२१ | अर्थसंकल्पित निधी | फेब्रुवारी, २०१५ | मार्च, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ०२-मजूरी | २१०.०० | ३१.५० | ०.०० | ३१.५० |
| २ | २१- पुरवठा व सामग्री | १४०.०० | २१.०० | ०.०० | २१.०० |
| एकूण | | ३५०.०० | ५२.५० | ०.०० | ५२.५० |

****